**को. प. बंधारा.बंदलगी ता. दक्षिण सोलापूर , जि. सोलापूर विशेष दुरुस्ती अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२४/ (प्र.क्र.२२८/२०२४)/ सिंव्य(कामे)**

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक:- ७ ऑगस्ट, २०२४

**वाचा:-**

१. कार्यकारी संचालक, कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे यांचे पत्र.जा.क्र.मकृखोविम ०२/(८१/२०२३)/उ.अ.-३/सिंव्य-१/१६५४/२०२४दि.५/३/२०२४
२. शासन निर्णय - २०१७/५६६/१७/सिंव्य(कामे), दि.३१/०८/२०१८.
३. शासन निर्णय - २०१८/५५१/१७/सिंव्य(कामे), दि.२७/११/२०१८
४. शासन निर्णय - २०१३/७८५/१३/सिंव्य (कामे),दि .१/८/२०१९
५. शासन परिपत्रक- प्रमा २०१३/७८५/१३/ सिंव्य (कामे),दि.१६/०९/२०२१.
६. शासन परिपत्रक क्र-प्रमा २०१३/(७८५/१३)/ सिंव्य (कामे),दि १/१/२०१५.
७. शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२२/प्र.क्र.५१६/२०२२/सिंव्य(कामे) दिनांक १४/०३/२०२३.

**प्रस्तावना:-**

सोलापूर जिल्हयातील दक्षिण सोलापूर तालुक्यातील को.प.बंधारा बंदलगी ता. दक्षिण सोलापूर या प्रकल्पाचे काम जानेवारी १९७६ मध्ये सुरु होवून ऑगस्ट १९८१ मध्ये पुर्ण करण्यात आले. प्रकल्पाचे लेखे बंद झालेले आहेत. सदरचा प्रकल्प सिंचन व्यवस्थापनासाठी १९८२ मध्ये हस्तांतरीत करण्यात आला. हा प्रकल्प अवर्षण प्रवण क्षेत्रात असून धरण पाणलोट क्षेत्रात ५०३ मी. मी. इतके सरासरी वार्षिक पर्जन्यमान आहे.

बंदलगी को.प. बंधा-याच्या उजव्या तिरावरील स्तंभ क्र. १ ते १० व ११ ते ५३ असे एकूण ३५ दगडी बांधकाम केलेले स्तंभ नव्याने संधानकामध्ये बांधणे गरजेचे आहे. बंधारा मजबूतीकरण व पाया पातळीतून गळती कमी करणे तसेच बंधा-यामध्ये पूर्ण संचय पातळीपर्यंत पाणीसाठा गळतीविरहीत करणे यासाठी बंधा-याचे दुरुस्तीचे कामे करणे आवश्यक आहे. को. प. बंधा-याच्या खालील (D/S) बाजूस Appron आस्तित्वात नाही. त्यामुळे सदयस्थितील स्लॅब पूर्णतः खराब झालेले असून लोखंडी सळई उघडे पडलेले आहे त्यामुळे स्तंभ पायापासून स्लॅबसह काँक्रीटीकरण करणे गरजेचे आहे. को.प. बंधा-यामध्ये निडल्स टाकण्यासाठी पिअरमध्ये असणारे चॅनेल सेक्शन ब-याच ठिकाणी तुटलेले व वाकडे झालेले आहेत. त्यामुळे चॅनेल सेक्शन बदलणे आवश्यक आहे.

सदर को.प.बंधा-याचे काम पूर्ण झाल्यावर बंधा-याचे मजबूतीकरण व गळती बंद होऊन पूर्ण संचय पाणीसाठा होणार आहे व त्यामुळे संबधित लाभधारक शेतक-यांना पुरेसे प्रमाणात पाणी उपलब्ध होणार आहे.

या पार्श्वभूमीवर बंधा-याच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने दुरूस्ती होणे आवश्यक असल्याने को. प. बंधारा बंदलगी ता.दक्षिण सोलापूर , जि.सोलापूर या योजनेच्या दुरूस्ती कामास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याअनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

शासन निर्णय:-

महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे अंतर्गत को. प. बंधारा बंदलगी ता.दक्षिण सोलापूर , जि.सोलापूर या को. प. बंधा-यांच्या विशेष दुरूस्ती कामाच्या रू ४,२३,३४,७९३/- (रू.चार कोटी तेवीस लक्ष चौतीस हजार सातशे त्र्याण्णव फक्त) एवढ्या खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) तांत्रिक मान्यता,निविदा प्रक्रिया,कामाचे नियोजन व पूर्णत्व, प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत खर्च करणे इ. बाबींसाठी प्रचलित शासन निर्णय / परिपत्रके यांचे पालन करणे बंधनकारक राहिल.

२) प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम तोडफोड याव्दारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

३) सदर अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ सर्वसाधारणपणे मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.

४) सदर दुरूस्ती काम सुरु करण्यापूर्वी प्रकल्पाच्या लाभक्षेत्रांतर्गत पाणी वापर संस्था स्थापित करून काम पूर्ण झाल्यानंतर लाभक्षेत्र हस्तांतरीत करणेची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रिय अधिका-यांची राहील.

५) प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास मान्यता गृहीत धरली जाणार नाही.

६) प्रत्यक्ष काम सुरु करण्यापूर्वी संकल्पनास सक्षम स्तरावर मान्यता घ्यावी.

७) बंधाऱ्यावरील प्रत्यक्ष सिंचन व पाणीपट्टी वाढविण्याबाबत क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी प्रयत्न करावेत.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०२ लघु पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका विशेष दुरूस्ती / विस्तार व सुधारणा कार्यक्रमा अंतर्गत भाग भांडवली अंशदान (००)(१५) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास

महामंडळ, भाग भांडवली अंशदान (उर्वरीत महाराष्ट्र) (कार्यक्रम) (४७०२ ७४५२) (योजनांतर्गत) ५४ गुंतवणुका या लेखाशिर्षा खाली टाकुन मंजुर अनुदानातुन भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवही मध्ये क्र. ८ सन २०२४-२५ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावरwww.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२४०८०७१६११३७९६२७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2024.08.07 16:27:10 +05'30'

**(न.गौ.बसेर)**
**शासनाच्या उप सचिव**

**सोबत : सहपत्र**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा.उपमुख्यमंत्री (जलसपंदा /वित्त) यांचे प्रधान सचिव,
४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
५) मा. उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
८) अ.मु.स. (वित्त) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
९) अ.मु.स. (नियोजन) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१०) अमुस (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
११) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१२) सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१४) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१५) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
१६) मुख्य अभियंता (वि.प्र.) ,जलसंपदा विभाग ,पुणे
१७) आंतर वित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१८) अधीक्षक अभियंता व प्रशासक ,लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, सोलापूर
१९) कार्यकारी अभियंता, सोलापूर पाटबंधारे विभाग, सोलापूर
२०) सिं.व्य.(कामे)कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२४/ (प्र.क्र.२२८/२०२४)/ सिंव्य (कामे),**

**दि. ७/ ०८ / २०२४ चे सहपत्र**

| **Sr.No.** | **Description of Item** | **Amount in ( Rs. )** |
|---|---|---|
| 1 | C - Works (excluding Royalty) | ३३५३३५३२ |
| 2 | Dewatering Charges | ३७८२१२ |
| 3 | ०.०५ % Quality Control | १६७६६८ |
| 4 | Royalty | ८७८००४ |
| ५ | १ % Insurance | ३३५३३५ |
| ६ | १८ % GST | ६०३६०३६ |
| ७ | ३% Contingencies | १००६००६ |
| | **Total Rs.** | **रू. ४,२३,३४,७९३** |

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2024.08.07 16:27:29 +05'30'

**(न.गौ.बसेर)**
**शासनाच्या उपसचिव**